दिघी व रेवस (आवरे) या बंदराच्या विकासासाठी बंदर विकास धोरणात सुधारणा करुन सामंजस्य करार (MoU) पध्दतीने अनुक्रमे मे.बालाजी लिर्जींग ॲण्ड इंडस्ट्रिज लि. आणि मे.अम्मा लाईन्स प्रा.लि. या कंपन्यांसोबत करावयाच्या कारारनाम्यास मान्यता देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र. जेईटी- ०५/२००२/प्र.क्र. ३२/बंदरे -२, दि. २४ .४.२००२
मंत्रालय, मुंबई -३२

वाचा :- (१) शासन निर्णय क्र. जेईटी-१०९५/प्र.क्र. १४७/परि-५, दि. १५.३.१९९६
(२) शासन निर्णय क्र. जेईटी-०५/२०००/प्र.क्र.३२/बंदरे -२, दि. २८.११.२०००
(३) शासन निर्णय क्र. जेईटी-०५/२०००/प्र.क्र. ३२/बंदरे -२, दि.२८.११.२०००
( दिघी / रेवस बंदराच्या विकासकांची निवड करणे बाबत)

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्र. जेईटी -१०९५/प्र.क्र. १४७/ परि-५, दिनांक १५.३.१९९६ अन्वये महाराष्ट्र शासनाने बंदर विकासाचे धोरण जाहीर केले होते व त्या अनुषंगाने प्रथम टप्प्यात सात बंदराचा विकास करण्यासाठी जागतिक निविदा काढण्यात आली. तथापि, त्यास योग्य तो प्रतिसाद न मिळाल्यामुळे प्रत्यक्षात एकाही बंदराचा विकास होऊ शकला नाही. म्हणून यापूर्वीच्या बंदर विकासाच्या धोरणात सुधारणा करुन दिघी व रेवस (आवरे) बंदराचा विकास सामंजस्य करारपध्दतीने ( MOU) अनुक्रमे मे. बालाजी लिर्जींग ॲण्ड इंडस्ट्रिज कंपनी व मे. अम्मा लाईन्स प्रा.लि. या कंपन्यासमवेत करण्याबाबत मान्यता देण्यात आली. त्या अनुषंगाने दोन शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्र. जेईटी-०५/२०००/प्र.क्र.३२/बंदरे -२, दि. २८.११.२०००, ( बंदर विकासाच्या धोरणात फेरबदल करणे ) व शासन निर्णय क्र. जेईटी-०५/२०००/प्र.क्र. ३२/बंदरे -२, दि.२८.११.२००० ( दिघी / रेवस बंदराच्या विकासकांची निवड करणे बाबत) निर्गमित करण्यात आले. त्यानुसार या दोन्ही कंपन्यासमवेत करावयाच्या करारनाम्यास अंतिम स्वरुप देण्याची प्रक्रिया सुरु झाली. मसुदा करारनाम्याची छाननी शासनाच्या विविध प्रशासकीय विभाग व वित्तीय संस्थाकडून करुन घेतांना असे निर्देशनास आले की, करारनामा Bankable होण्याच्या दृष्टीने त्यामध्ये शासनाने यापूर्वी जाहीर केलेल्या बंदर विकासाच्या धोरणाच्या पलीकडे जावून काही तरतूदी करणे अनिवार्य आहे. त्या अनुषंगाने बंदर विकासाच्या धोरणात पुन्हा सुधारणा करण्यासाठीचा प्रस्ताव व त्या अनुषंगाने दिघी व रेवस (आवरे) बंदराचा विकास करण्यासाठी सदर कंपन्यासोबत करावयाचा करारनामास मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

**(१) शासकीय जमीन :-**

(I) बंदर प्रकल्पास लागणारी शासकीय जमीन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून मान्यता प्राप्त सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) नुसार शासनाकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला रुपये १/- प्रतिवर्ष एवढया नाममात्र भाडेपट्टयाने उपलब्ध करुन दिली जाईल.

(II) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड शासकीय जमीन बंदर विकसित करणा-या लायन्ससीला ५० वर्षाच्या कालावधीसाठी रुपये १/- प्रतिवर्ष एवढया नाममात्र भाडेपट्टयाने देईल तसेच महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला Special Purpose vehicle (SPV ) च्या issued and Paid up Capital च्या ११ टक्के पर्यत समभाग घेण्याची मुभा असेल. असा समभाग शासकीय जमीनीच्या बाजारमुल्याच्या स्वरुपात असेल. शासकीय जमीनीचे बाजारमुल्य महसुल व वन विभाग यांचेकडून निश्चित करण्यात येईल.

(III) शासकीय जमीनीचे बाजारमुल्य जर ११ टक्के समभागाच्या मुल्यापेक्षा कमी असेल तर तेवढयाच प्रमाणात महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड समभाग घेईल किंवा उर्वरित मुल्य रोखीने भरुन किंवा पट्टी पोटी लायसन्सीकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास मिळणा-या रकमेतून प्रकल्प कार्यान्वीत झाल्याच्या तारखेपासून १० वर्षापर्यत समभाग घेण्याची मुभा महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास असेल. तथापि, याबाबत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड व शासन यांना अंतिम निर्णय घेण्याची मुभा असेल.

(IV) शासकीय जमीनीचे बाजार मुल्य Special Purpose vehicle (SPV ) च्या issued and Paid up Capital च्या ११ टक्के पेक्षा जास्त असल्यास, लायसन्सी ११% च्या वरील रक्कम रोखीने शासनास जमा करेल. तथापि, अशी शासकीय जमीन लायसन्सीला रुपये १/- प्रतिवर्ष एवढया नाममात्र भाडेपट्टयाच्या दराने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डामार्फत दिली जाईल. शासकीय जमीनीची मालकी शासनाकडे अबाधीत राहील व कोणत्याही परिस्थितीत जमीनीची मालकी लायसन्सीला हस्तांतरीत होणार नाही.

(२) **खाजगी जमीन :-**

(I) मान्यता प्राप्त सविस्तर प्रकल्प अहवाला (DPR) नुसार जेवढी खाजगी जमीन बंदर प्रकल्पाच्या विकासासाठी आवश्यक असेल तेवढी खाजगी जमीन लायसन्सी संबंधित जमीन मालका समवेत खाजगी वाटाघाटीव्दारे खरेदी करु शकेल किंवा लायसन्सीने विनंती केल्यास व अशा खाजगी जमीनीच्या बाजारमुल्याची रक्कम लायसन्सीने आगाऊ शासनाकडे जमा केल्यास शासन अशी खाजगी जमीन भूसंपादन अधिनियमाच्या तरतूदीनुसार संपादन करुन देईल. अशा संपादित केलेल्या खाजगी जमीनीच्या बाबतीत सक्षम प्राधिकारी/न्यायालयाने वाढीव मोबदला अंतिमत: मंजूर केल्यास अशा वाढीव मोबदल्याची रक्कम जमीन मालकास देणे लायसन्सीवर बंधनकारक असेल.

(II) लायसन्सीने थेट खरेदी केलेली किंवा लायसन्सीच्या खर्चाने शासनाने संपादन केलेली खाजगी जमीन बंदर विकासासाठी स्थापन केलेल्या Special Purpose Vehicle या कंपनीच्या नावे राहील.

(III) या जमीनीच्या मालकी हस्तातंरणासाठी शासनाची पूर्व मान्यता आवश्यक राहील.

200270515512800-0200

**(३) जमीनीचा वापर :-**

शासकीय /खाजगी जमीनीचा वापर फक्त बंदर विकास किंवा त्या अनुषंगिक बाबीसाठीच करण्यात येईल.

(४) **लायसन्सीकडून ठरविण्यात येणा-या पट्टीचे प्रमाण अधिसूचित करणे ( Scales of Rates):-**

बंदराच्या ठिकाणी ज्या विविधि सेवा लायसन्सीकडून पार पाडण्यात येणार आहेत त्यासाठी (जल प्रवाशी वाहतूक वगळून) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ चे कलम ३७ च्या तरतूदीनुसार पट्टीचे प्रमाण लायसन्सी प्रस्तावित करेल व कलम ४१ च्या तरतूदी अन्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून अशा पट्टीचे प्रमाण राज्य शासनाच्या पूर्व मंजूरीने राजपत्रात प्रसिध्द केल्यानंतर दर अंमलात येतील. ही तरतूद महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ व भारतीय बंदर अधिनियम १९०८ च्या प्रस्तावित सुधारणेच्या अधीन असेल.

(५) **जमीनीची भाडेपट्टी व पट्टीची आकारणी, Performance Guarantee, Construction Guarantee,लायसन्सी फी इत्यादी :-**

(I) उपरोक्त अनुक्रमांक ४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राजपत्रात प्रसिध्द केलेल्या पट्टीच्या प्रमाणानुसार लायसन्सीकडून पार पाडलेल्या सेवा बद्दल अशी रक्कम वसुल करण्याचे पूर्ण अधिकार लायसन्सीस असतील व अशा वसुल केलेल्या पट्टीच्या रकमेपैकी बंदर कार्यान्वीत झाल्यानंतर प्रथम वर्षी रुपये ३/- प्रतिटन किंवा कंटेनर कार्गोसाठी रु. ३६ /- प्रति Loaded TEU या दराने रक्कम लायसन्सी महावार पुढील महिन्याच्या ७ तारखेपर्यंत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे भरणा करेल. अशा रक्कमेचा भरणा लायसन्सीने वेळेवर न केल्यास त्यावर २ टक्के प्रतिमाह या दराने व्याज लायसन्सीकडून आकारण्यात येईल.

(II) लायसन्सीने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास पट्टीपोटी वसुल केलेल्या रकमेमधून ( वर नमूद केलेल्या दराने ) द्यावयाच्या रकमेमध्ये पहिल्यावर्षी रुपये ३/- प्रतिटन व तदनंतर प्रतिवर्षी त्या लगतच्या पूर्वीच्या वर्षी आकारण्यात येत असलेल्या रकमेवर २० टक्के वाढ करण्यात येईल व अशी वाढ बंदर कार्यान्वीत झालेल्या तारखेपासून पहिल्या १५ वर्षासाठी लागू राहील. अशा रकमेचा लायसन्सीने उशीरा भरणा केल्यास त्यावर लायसन्सीकडून दरमहा २% दराने व्याज आकारले जाईल. १६ व्या वर्षापासून पुढील सवलतीच्या कालावधीसाठी लायसन्सीने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास पट्टीच्या स्वरुपात द्यावयाच्या रकमेबाबत त्या वेळेची परिस्थिती व इतर अनुषंगिक बाबी विचारात घेऊन व लायसन्सीसोबत विचारविनिमय करुन शासन / महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड स्वतंत्रपणे निर्णय घेईल.

(III) लायसन्सीकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास पट्टीपोटी देय रक्कम व शासकीय जमीनीच्या भाडेपट्टीपोटी देय रक्कम एकत्रित करुन त्या रकमेएवढी Bank Guarantee लायसन्सी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास देईल. पहिल्या वर्षी Bank Guarantee ची रक्कम ही DPR नुसार अंदाजित केलेल्या कार्गोवरील वसुल करावयाच्या अपेक्षित पट्टीच्या दराने जेवढी रक्कम महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास देय असेल अधिक जमीनीच्या भाडेपट्टीपोटी देय असलेली रक्कम, अशा एकत्रित रकमे एवढी असेल. त्या नंतर पुढील कालावधीसाठी Bank Guaranteeची रक्कम मागिल लगतच्या वर्षी प्रत्यक्षात

2002705155128000-0200

जेवढी पट्टीपोटीतील रक्कम लायसन्सीकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास देय झाली असेल/भरली असेल अधिक शासकीय जमीनीच्या भाडेपट्टीची रक्कम जेवढी देय झाली असेल/ भरली असेल, त्याच्या एकत्रित रकमे एवढी असेल. अशा Bank Guarantee चे दर वर्षी १ एप्रिल रोजी लायसन्सीकडून नुतनीकरण करुन घेण्यात येईल. अशा प्रकारची Bank Guarantee हि irrevocable व unconditional असेल.

(IV) लायसन्सी रुपये एक कोटी फक्त एवढी Performance Guarantee हि Bank Guarantee च्या स्वरुपात लायसन्सरच्या नांवाने प्रकल्प कार्यान्वीत झाल्यापासून ६० दिवसाच्या आत देईल. तसेच Construction Guarantee हि पहिल्या टप्प्यातील Contracted assets च्या किंमतीच्या ३ % किंवा रुपये पाच कोटी, यापैकी जी कमी असेल तेवढया रकमेच्या बँक गॅरटी च्या स्वरुपात लायसन्सी हे लायसन्सरचे नांवे देतील. अशा प्रकारची Bank guarantee हि irrevocable व unconditional असेल

(V) करारनामा स्वाक्षरीत करण्यापूर्वी लायसन्सी रुपये १०/- लाख लायसन्स फीच्या स्वरुपात लायसन्सर कडे भरणा करेल. सदर लायसन्स फी फक्त एकाच वेळी आकारण्यात येईल.

(६) **पोच मार्ग, उड्डाणपुल, वीजपुरवठा, पाणी पुरवठा इत्यादीची व्यवस्था करणे :-**

(I) बंदर हद्दीच्या आतील सर्व रस्त्याचे बांधकाम, देखभाल व दुरुस्ती लायसन्सी स्वत:च्या खर्चाने करेल.

(II) सहा पदरी पोच मार्ग/पोच मार्गावरील उड्डाण पुल ( त्यासाठी आवश्यकता भासल्यास लागणारी खाजगी जमीन व खाजगी जमीनीचे बाजारमुल्यासह ) लायसन्सी BOT तत्वावर पुर्ण करेल. यास प्रतिसाद न मिळाल्यास महाराष्ट्र शासनाच्या सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत Central Road Fund ( C.R.F. ) मधून निधी मिळविण्याचा प्रयत्न विहित कालावधीत केला जाईल. जर CRF मधून निधी मिळविणे विहित कालावधीत शक्य न झाल्यास पोच मार्गाचे बांधकाम ( आवश्यकता भासल्यास खाजगी जमीनीचे संपादन करुन व आवश्यकतेनुसार उड्डाण पुलासह ) सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रकास मान्यता घेऊन लायसन्सी प्रथम स्वत:च्या खर्चाने करेल. त्यानंतर शासनाचा ५० टक्के हिस्सा ( शासकीय जमीनीचे बाजारमुल्य वजा करुन ) Measurement Book इत्यादीची पडताळणी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करुन घेऊन लायसन्सी कडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास देय होणा-या पट्टीपोटीतील (रॉयल्टीच्या ) रकमेतून समायोजित केला जाईल. अशा प्रलंबित रकमेवर कोणतेही व्याज आकारले जाणार नाही.

(III) पोच मार्ग/ उड्डाण पुलाचे बांधकाम Indian Road Congress यांनी ठरवून दिलेल्या मानकानुसार लायसन्सी करेल.

(IV) वीज पुरवठा, पाणी पुरवठा, टेलिफोन लाईन्स इत्यादीची व्यवस्था लायसन्सी स्वखर्चाने करेल.

(७) **पर्यावरण तसेच इतर विभागाचे ना हरकत दाखले प्राप्त करणे :-**

पर्यावरण व इतर विभागाचे ना हरकत दाखले प्राप्त करण्याची संपूर्ण जबाबदारी लायसन्सीची असेल व शासन/महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अशा ना हरकत दाखले/परवानग्या प्राप्त करण्याकरिता लायसन्सीस सहकार्य करेल.

200270515512800-0200

(८) **सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) सादर करणे :-**

(I) करारनाम्यावर स्वाक्षरी झालेल्या तारखेपासून १८ महिन्याच्या कालावधीमध्ये सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) सादर करणे लायसन्सीवर बंधनकारक राहील.

(II) DPR ची छाननी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड त्यांनी नियुक्ती केलेल्या Indian Proof Consultant यांच्या व्दारे करुन त्यामध्ये काही उणीवा असल्यास किंवा सुधारणा करण्याची आवश्यकता असल्यास तसे निदेश लायसन्सीला देईल. त्रुटीची पुर्तता केल्यानंतर सुधारीत DPR किंवा त्याच्या भागास महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड दोन महिन्याच्या आत मान्यता देईल.

(९) **अभियांत्रिकी आराखडयांचा तपशील सादर करणे :-**

(I) बंदर प्रकल्पाची रचना, अभियांत्रिकी आराखडा, वास्तुरेखाचित्र, बांधकाम आराखडा व तंत्रज्ञान इत्यादीचे आराखडे लायसन्सीने स्वखर्चाने तयार करुन करारनाम्यात नमूद केलेल्या Zero Date च्या संकल्पनेनुसार Zero Date पासून सहा महिन्याच्या आत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास मान्यतेसाठी सादर करेल.

(II) परिपूर्ण आराखडयास Indian Proof Consultant च्या सल्ल्याने महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड दोन महिन्यात मंजूरी देईल.

(III) लायसन्सरच्या पूर्व परवानगी शिवाय मंजूरी दिलेल्या आराखडयात लायसन्सीला बदल करता येणार नाही.

(IV) Indian Proof Consultantची नियुक्ती महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड लायसन्सीच्या खर्चाने करेल.

(१०) **लायसन्सीस दुय्यम कंत्राटदाराची नेमणूक करण्याची परवानगी देणे (Sub-Concessions) :-**

लायसन्सीस पायाभूत सुविधांची उभारणी करण्यासाठी उद्योजक/कंत्राटदारा समवेत कंत्राट करण्याची मुभा असेल तथापि, करारनाम्यातील सर्व तरतुदी, अटी व शर्तींचे पालन करण्याची जबाबदारी प्रामुख्याने लायसन्सीचीच असेल.

(११) **वित्त पुरवठा ( Financing) :-**

(I) बंदर विकास प्रकल्पाची उभारणी, कार्यचलन, व देखभाल याकरिता सर्व भांडवल उभे करण्याची जबाबदारी लायसन्सीची असेल.

(II) वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणे, गहाण खत तसेच इतर पर्यायी वित्तीय व्यवस्था करण्याबाबत महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची पूर्व परवानगी घेणे लायसन्सीस बंधनकारक असेल. तथापि महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड ही परवानगी उचीत व पर्याप्त कारणाशिवाय थांबविणार नाही.

(१२) **अकल्पीत व अपरिहार्य बाबीमुळे होणा-या विलंबास मान्यता देणे ( Force Majeure ) :-**

करारनाम्याच्या अंमलबजावणीच्या कालावधीमध्ये काही अपरिहार्य कारणास्तव जसे युध्द,नैसर्गिक आपत्ती, संप , दंगे, सामाजिक राजकीय कारणे, न्यायालयीन आदेश इत्यादीमुळे प्रकल्पाच्या कामकाजास

काही अडचण निर्माण झाल्यास ते ग्राह्य धरण्यात येईल. तथापि लायसन्सीकडून काही बाबी जसे की, यंत्रसामुग्री किंवा तत्सम आवश्यक बाबी वेळेवर पुरवठा न होणे, लायसन्सीच्या स्वतःच्या किंवा दुय्यम लायसन्सीच्या कंपनीमध्ये संप किंवा इतर कारणामुळे विलंब झाल्यास त्या बाबी विचारात घेतल्या जाणार नाहीत.

(१३) **विवाद अभिनिर्णय मंडळ व लवाद नियुक्तीची तरतूद :-**

(I) शासन /महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड व लायसन्सी यांचेमध्ये वाद / विवाद निर्माण झाल्यास तो आंतरराष्ट्रीय स्तरावर मान्यताप्राप्त संकल्पनेनुसार स्थापित Dispute Adjudication Board (DAB) यांचे समोर निर्णयासाठी सोपविला जाईल.

(ii) DAB व्दारे असा वाद / विवाद न मिटल्यास The Arbitration and Concilation Act, १९९६ किंवा तत्सम वैधानिक तरतुदीच्या अनुषंगाने प्रकरण लवादासमोर निर्णयार्थ सादर करण्यात येईल.

(III) DAB व लवाद मुंबईस्थित असेल.

(IV) DAB चा खर्च महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड व लायसन्सी हे ५०:५० या प्रमाणात करतील.

(V) DAB ची स्थापना करारनामा स्वाक्षरीत केल्यापासून प्रथम ६ वर्षासाठी असेल आणि आवश्यकतेनुसार DAB पुढील कालावधीसाठी चालू ठेवण्याबाबत योग्य त्या वेळी स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल.

(१४) **लायसन्सी किंवा शासन/महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी करारनाम्यातील अटी व शर्तीचा भंग केल्यास मुदतपूर्व करारनामा रद्द करणे ( Early Termination ) :-**

(I) करारनाम्यातील अटी/शर्तीचे लायसन्सीने भंग केल्यास त्यास Licensee's Event of Default असे समजण्यात येईल. तसेच करारनाम्यातील अटी व शर्तीचे शासन /महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने भंग केल्यास त्यास Licensor's Event of Default असे समजण्यात येईल.

(II) करारनाम्यातील अटी/शर्तीचा भंग झाल्यास/केल्यास अकसूरदार पक्षातर्फे ( Non Defaulting Party ) कसूरदार पक्षास ( Defaulting Party ) Notice of Intent to Terminate देऊन त्याची प्रत वित्त पुरवठा करणा-या संस्थेस पृष्ठांकित करेल. अशी नोटीस प्राप्त झाल्यापासून ९० दिवसांचे आत कसूरीची पूर्तता केल्यास अशी Notice of Intent to Terminate आपोआप रद्द होईल किंवा अशी नोटीस मागे घेतली जाईल. ह्या ९० दिवसाच्या कालावधीमध्ये कसूरदार पक्ष व वित्त पुरवठा करणा-या संस्थेचे अधिकार अबाधीत राहतील व त्या अधिकारामध्ये अकसूरदार पक्षाकडून कोणताही अडथळा आणला जाणार नाही

(III) Notice of Intent to Terminate कसूरदार पक्षास देऊन कसूरदार पक्षाने झालेल्या कसूरीची ९० दिवसांत पूर्तता न केल्यास, अकसूरदार पक्ष करारनामा रद्द करण्यासाठी कसूरदार पक्षास ९० दिवसाच्या मुदतीची Termination Notice देऊन त्याची प्रत वित्त पुरवठा करणा-या संस्थेस देईल.

(IV) Termination Notice महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने कसूरदार लायसन्सीला दिल्यास ३० दिवसाच्या आत वित्त पुरवठा करणारी/ करणा-या वित्त संस्था मूळ लायसन्सीच्या ठिकाणी नवीन लायसन्सी नेमण्यासाठी Replacement Notice व्दारे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड/ शासनास विनंती करेल/ करतील. Replacement Notice मधील नामनिर्देशित लायसन्सीची ( Nominated Licensee) तांत्रिक,

आर्थिक, व्यवस्थापकीय इत्यादी बाबींची क्षमता आजमावून शासन/महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अशा नामनिर्देशित लायसन्सीच्या नियुक्तीसाठी मान्यता देईल किंवा नामंजूर करेल. याबाबत शासन / महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डचा निर्णय अंतिम असेल.

(V) Termination Notice च्या कालावधीमध्ये उपरोक्त परिच्छेद (IV) मधील नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही न केल्यास Controlling Equity विकण्यासाठी त्या त्या वेळी अंमलात असलेल्या कायदेशीर तरतूदीच्या अधीन राहून निविदा मागविण्यांत येतील. तसेच, इतर समभागधारकांना ( महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डासह ) अशा निविदेव्दारे त्यांच्या समभागाची विक्री करण्याची मुभा असेल.

**(अ) लायसन्सीकडून करारनाम्यातील अटी/शर्तींचा भंग झाल्यास ( Licensee's Event of Default ) :-**

(a) उपरोक्त (IV) व (V) च्या अधीन राहून शासन /महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड Controlling Equity विकण्याकरिता निविदा मागवून सर्वोच्च देकार देणा-या निविदेदारास समभागाची विक्रि करेल. स्वीकृत केलेल्या निविदेव्दारे प्राप्त झालेल्या मूल्याच्या १० टक्के रक्कम महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड कसूरदार लायसन्सीकडून दंड म्हणून अशा निविदेव्दारे प्राप्त झालेल्या स्वीकृत रक्कमेतून वसूल करुन उर्वरित ९० टक्के रक्कम कसूरदार लायसन्सीला अदा केली जाईल. इतर सेबी किंवा तत्सम प्राधिकरणाच्या लागू असलेल्या नियमानुसार इतर समभागधारकांनाही त्यांचे समभाग निविदाकारास विक्री करण्याची मुभा राहील.

(b) काही कारणास्तव निविदा प्रक्रिया यशस्वी न झाल्यास किंवा वित्त पुरवठा करणा-या संस्थेची मान्यता Termination Notice दिल्यापासून १८ महिन्याच्या आत प्राप्त न झाल्यास, अशी Termination Notice मागे घेण्यांत आल्याचे समजण्यांत येईल.

**(ब) शासनाकडून/महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून करारनाम्यातील अटी/शर्तींचा भंग झाल्यास ( Licensor's Event of Default ):-**

(a) शासन/महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून करारनाम्यातील अटी/शर्तींचा भंग झाल्यास लायसन्सीस वित्तीय संस्थेच्या मान्यतेने करारनामा रद्द करण्याची मुभा असेल. तसे झाल्यास Controlling Equity साठी निविदा शासनाकडून मागविण्यांत येतील. अशा निविदेव्दारे प्राप्त होणा-या सर्वोच्च देकाराची रक्कम लायसन्सीस मान्य असल्यास तो स्विकारील व ही रक्कम Controlling Equity धारण करणा-या समभागधारकांमध्ये त्यांच्या समभागांच्या प्रमाणात वितरित केली जाईल. तथापि, सर्वोच्च देकाराची रक्कम लायसन्सीच्या दृष्टीने अपुरी असल्यास, अशी रक्कम न स्वीकारता, Termination Notice मागे घेऊन बंदर प्रकल्पाचे प्रचलन पुढील कालावधीसाठी सुरु ठेवण्याची मुभा लायसन्सीला असेल.

(b) तसेच सर्वोच्च देकाराची रक्कम लायसन्सीने स्वीकारल्यास, त्या रकमेशिवाय अशा स्वीकृत देकार रकमेच्या १०% रक्कम दंड म्हणून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून लायसन्सीला देय राहील. सदर १०% दंडाची रक्कम पुढीलप्रमाणे लायसन्सीला देय राहील.

२० टक्के रक्कम - प्रत्यक्ष हस्तांतरणाच्या तारखेदिवशी

३० टक्के रक्कम - प्रत्यक्ष हस्तातरणाच्या तारखेपासून ६ महिन्याच्या कालावधीत आणि

उर्वरित ५० टक्के रक्कम - प्रत्यक्ष हस्तांतरण तारखेपासून १८ महिन्यांच्या आत देय राहील.

200270515512800-0200

(c) प्रत्यक्ष हस्तांतरण तारखेनंतर देय असणा-या रकमेवर द.सा.द.शे. १२ टक्के याप्रमाणे व्याज देय राहील. अशी रक्कम उपरोक्त नमूद केलेल्या वेळापत्रकाप्रमाणे देण्यास महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून कसूर झाल्यास दंडनीय व्याज म्हणून द.सा.द.शे. २ टक्के या दराने अंतिम रित्या दंडाची रक्कम अदा करण्यापर्यंतच्या प्रत्येक दिवसासाठी आकरले जाईल.

(d) आणखी असे की, Termination Notice च्या तारखेपासून १८ महिन्याच्या कालावधीमध्ये जर निविदाप्रक्रिया यशस्वीरित्या पूर्ण झाली नाही तर लायसन्सीला Termination Notice मागे घेण्याची मुभा असेल.

(१५) **सवलतीच्या कालावधीनंतरचे सामान्य हस्तांतरण ( Normal Transfer at the end of Concession Period ) :-**

(अ) लायसन्सरच्या मर्जीनुसार व लायसन्सर ठरविल त्या अटी / शर्तीवर नवीन सवलतीसाठी Controlling Equityकरिता निविदा मागविण्यात येतील. निविदेद्वारे प्राप्त होणा-या सर्वोच्च देकार रकमेची महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड व समभागधारक यांच्यामध्ये ५०:५० या प्रमाणात विभागणी करण्यात येईल.

उपरोक्त नमूद समभागाची विक्री त्या त्या वेळी या बाबतच्या कायदेशीर तरतूदीच्या अधीन राहून करण्यात येईल

**किंवा**

**(ब)** संपूर्ण स्थावर मालमत्ता ( All immovable assets ) व Essential movable contracted assets हे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरीत होतील व बंदर प्रकल्पाचे पुढील प्रचलनाकरिता महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड पुढील सवलतीच्या कालावधीसाठी निविदा मागवून संपूर्ण बंदर प्रकल्प नवीन विकासकास देईल आणि अशा निविदेतून प्राप्त होणा-या रकमेची, समभागधारक व महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांचे मध्ये ५०:५० या प्रमाणात विभागणी करण्यांत येईल.

(१६) **महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास लायसन्सी सोबत करारनामा करण्यास प्राधिकृत करणे :-**

शासनाच्या बंदर विकासाच्या धोरणानुसार व महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड अधिनियम, १९९६ च्या तरतूदीनुसार महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास लायसन्सर म्हणून लायसन्सीसोबत करारनामा करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

(१७) **हक्क हस्तांतरण ( Assignability ) :-**

लायसन्सी हे लायसन्सरच्या पूर्व परवानगी शिवाय Port Complex किंवा करारनाम्यातील तरतूदीचे Rights, Title or Interest त्रयस्थ पक्षास हस्तांतरण करणार नाहीत. तथापि, अशी परवानगी सबळ कारणाशिवाय लायसन्सर रोखणार नाही.

२००८०७०५१५५१२८००१-०२०७

(१८) **प्रवासी वाहतुकीची सुविधा लायसन्सीने करणेबाबतची तरतूद काढून टाकणे :-**

शासन निर्णय दिनांक १५.३.१९९६ मधील तरतुदीनुसार लायसन्सीने बंदर हद्दीमध्ये जलप्रवासी वहातुकीच्या सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत तरतूद करण्यात आली होती. परंतु याबाबत पुर्नःविचार करुन ही तरतूद वगळण्यात येत आहे.

(१९) **प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी शक्ती प्रदान समितीची स्थापना :-**

बंदर विकास प्रकल्प व मुंबई सभोवताली जल प्रवासी वाहतुक या प्रकल्पाची अंमलबजावणी यशस्वीपणे करण्यासाठी मा. मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदान समिती स्थापन करण्यात येत आहे. (परिशिष्ट "अ" ) या शक्तीप्रदान समितीस बंदर विकास व जल प्रवासी वाहतुक प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना अनुषंगिक बाबी / धोरणात बदल करण्याची आवश्यकता भासल्यास संबंधित विभागाच्या मा. मंत्री यांच्या मान्यतेने सर्व प्रकारचे अंतिम निर्णय घेण्याचे पूर्ण अधिकार असतील.

(२०) (अ) बंदर विकासाच्या धोरणात्मक निर्णयाच्या बाबतीतील शासन निर्णय क्र. जेईटी- १०९५/प्र.क्र. १४७/परि-५, दिनांक १५.३.१९९६ व शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्र. जेईटी-०५/२०००/प्र.क्र.३२/बंदरे -२, दि. २८.११.२००० मधील ज्या बाबींमध्ये बदल केले नाहीत त्या बाबी जशास तशा उपरोक्त नमूद सुधारणासह बंदर विकास धोरणास लागू राहतील.

(ब) उपरोक्त (अ ) मध्ये नमूद केलेल्या सुधारीत बंदर विकासाच्या धोरणातील तरतूदीसह दिघी व रेवस (आवरे) बंदराचा विकास अनुक्रमे मे. बालाजी लिजींग ॲण्ड इंडस्ट्रिज कंपनी आणि मे.अम्मा लाईन्स प्रा.लि. या लायसन्सी कंपनी समवेत स्वाक्षरीत करावयाच्या करारनाम्यास राज्य मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे.

(क) उपरोक्त (अ) येथे नमूद केल्याप्रमाणे बंदर विकासाचे सुधारीत धोरण दिघी व रेवस (आवरे) बंदराशिवाय इतर ज्या ज्या बंदराचा विकास सामंजस्य कराराव्दारे (MOU ) करण्यात येईल, अशा सर्व बंदरांना हे धोरण लागू राहील.

(२१) हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर ३२७/२००२/व्यय-८, दिनांक ३०.३.०२ आणि महसूल व वन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ १२५/ज-४ , दि. १६.३.०२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

के. नलिनाक्षन

( के. नलिनाक्षन )
प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

एच-178(300-04-02)-3. 200270515512800-0200

३) मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव. (सर्व )
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई.
५) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (पर्यावरण ), मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई.
११) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई .
१२) सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई.
१५) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
१६) जिल्हाधिकारी, मुंबई शहर/ उपनगरे/ठाणे/ रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग.

गृह विभाग क्र.जेईटी ०५/२००२/प्र.क्र.३२/बंदरे-२ दि.२४/४/२००२
च्या शासननिर्णयाचे जोडपत्र

**परिशिष्ट 'अ'**

विषय:- बंदर विकास व जलप्रवासी वाहतूक धोरणाची अंमलबजावणी करण्याकरीता शक्ती प्रदान समिती .

I. सध्याच्या मुक्त आर्थिक व्यवस्थेत राज्याच्या आर्थिक व सामाजिक विकासात बंदर विकासाच्या विषयाला महत्वाचे स्थान आहे. बंदर विकास व जलप्रवासी वाहतूकीसाठी गुंतवणूक करण्याकरीता खाजगी उद्योजकांना आकर्षिक करण्याच्या दृष्टीने राज्य शासनाने बंदर विकासाचे व जलप्रवासी वाहतूक प्रकल्पाचे धोरण जाहीर केले आहे.या धोरणानुसार शासनाने दिघी व रेवस ( आवरे) या बंदरांच्या विकासाची जबाबदारी अनुक्रमे मे.बालाजी लिजिंग इंडस्ट्रीज लि. व मे.अम्मा लाईन्स प्रा.लि.या कंपन्यांना सोपविण्याचा निर्णय घेतला आहे.तसेच खाजगी उद्योजकांमार्फत मुंबई शहर व मुंबई उपनगरे जिल्ह्याच्या परिसरात बारमाही जलप्रवासी वाहतूक सुरू करण्याकरीता निविदा मागविण्यात आल्या आहेत.राज्याच्या पूर्व समुद्र किनारपट्टीवर देखील प्रवासी वाहतूक सुरू करण्याची प्रक्रिया सुरू आहे.त्याच प्रमाणे राज्यातील इतर बंदरांच्या विकासाकरीता देखील निविदा मागविण्यात आल्या आहेत.

II. शासनाचे सुधारित बंदर विकास धोरण व प्रवासी जलवाहतूकीचा प्रकल्प या दोन्ही प्रकल्पांची जलद व प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी शासनाने शक्ति प्रदान समितीचे गठण करण्याचा निर्णय घेतला आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील. :-

| | | |
|---|---|---|
| मा. मुख्य सचिव | : | अध्यक्ष |
| प्रधान सचिव (नियोजन) | : | सदस्य |
| प्रधान सचिव (वित्त) | : | सदस्य |
| प्रधान सचिव (नगर विकास) | : | सदस्य |
| प्रधान सचिव (परिवहन, राज्य उत्पादन शुल्क व बंदरे) | : | सदस्य |
| प्रधान सचिव (महसूल) | : | सदस्य |
| प्रधान सचिव (विधी व न्याय) | : | सदस्य |
| सचिव (सार्वजनिक बांधकाम) | : | सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ | : | सदस्य |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरी टाईम बोर्ड, मुंबई, | : | सदस्य |
| उप सचिव (बंदरे), गृह विभाग | : | सदस्य |

2002705155128000-0200

III. शासनाने गठीत केलेल्या वरील शक्तीप्रदान समितीच्या जबाबदाऱ्या व अधिकार खालीलप्रमाणे असतील.

(१) बंदर विकासाच्या विविध प्रकल्पांचा व जलप्रवासी वाहतूक प्रकल्पाचा वेळोवेळी आढावा घेणे.

(२) बंदर विकासाचे व प्रवासी जलवाहतूकीचे प्रकल्प राबविण्यात येत असलेल्या अडचणी सोडविण्याकरिता करण्यात आलेल्या विविध करारांमध्ये योग्य त्या सुधारणा करण्यास मंजूरी देणे.

(३) बंदर विकास व प्रवासी जलवाहतूक प्रकल्पासंदर्भातील योजनांना मान्यता देणे.

(४) बंदर विकास व प्रवासी जलवाहतूक या कामांकरिता पदांची निर्मिती करणे व अशी पदे भरण्याकरिता मंजूरी देणे.

(५) बंदर प्रकल्प / जल प्रवासी वाहतूक प्रकल्पाची अमजबजावणी करताना काही अडचणी उद्‌भवल्यास शासनाच्या धोरणात आवश्यक अनुषंगिक बाबी /धोरणात बदल करून प्रकल्पाची उभारणी किंवा प्रकल्प सुरु ठेवण्याबाबत कार्यवाही करणेबाबत समितीस अंतिम निर्णय घेण्याचे पूर्ण अधिकार असतील.

(६) शक्तिप्रदान समितीच्या निर्णयाप्रमाणे संबंधीत विभागाचे मंत्रिमहोदयांच्या मान्यतेने आदेश निर्गमित करणे.